**सन १९८४ च्या शीख दंगलीत मालमत्तेचे नुकसान झालेल्या ज्या आपद्ग्रस्तांना केंद्र शासनाच्या धोरणानुसार मदत मिळालेली नाही व राज्य स्तरीय समितीने अशा प्रकरणी प्रत्यक्ष नुकसान झाल्याचे मान्य केले आहे अशा एकूण ६५ प्रकरणांमध्ये नुकसानीइतकी रक्कम मंजूर करण्याबाबत ...**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्र. आरएलएफ-०५-०६/प्र.क.२०८/भाग-२ /म-३**

मंत्रालय,मुंबई-४०००३२.

दिनांक : २ मे, २०१५

**वाचा :-**

१) केंद्र शासनाचे पत्र क्र.U-१३०१८/४६/२००५-Delhi(NC),दि.१६.१.२००६

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.सीएलएस-०५-०६/प्र.क्र२०७/म-३ दि.१७.११.२००६

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.सीएलएस-०३-०७/प्र.क्र१४३/म-३,दि.२.७.२००७

४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.सीएलएस-०३-०७/प्र.क्र१४३/म-३,दि.२९.३.२००८

५) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.न्याप्र-२०१४/प्र.क्र३३२/म-३,दि.७.१.२०१५

६) केंद्र शासनाचे पत्र क्र.U-१३०१८/३/२०१५-Delhi-१ (NC),दि.१८.२.२०१५

७) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे अ.शा. पत्र क्र.मशा/कार्या/१/आर८८६६/१५ दि.२४.२.२०१५

८) जिल्हाधिकारी, अहमदनगर यांचे पत्र क्र. टंचाई/कार्या-१९-अ/७२३/२०१५ दि.६.४.२०१५

**प्रस्तावना :-**

सन १९८४ साली तत्कालीन पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांच्या हत्त्येनंतर उद्भवलेल्या दंगलीमध्ये बाधित झालेल्या आपद्ग्रस्तांना मदत देण्यासंदर्भात न्यायमूर्ती नानावटी यांच्या अध्यक्षतेखाली आयोग नेमण्यात आला होता. त्यानंतर आयोगाच्या शिफारशींची अंमलबजावणी करण्यासाठी केंद्र शासनाने दि.१६ जानेवारी, २००६ रोजी विशेष पॅकेज जाहीर केले होते. त्या अनुषंगाने सन १९८४ च्या शीख दंगलीमधील बाधित व्यक्तींच्या नुकसानीच्या दाव्यांची तपासणी करण्यासाठी राज्यस्तरावर प्रधान सचिव, मदत व पुनर्वसन यांच्या अध्यक्षतेखाली दि.१७ नोव्हेंबर, २००६ च्या शासन निर्णयान्वये एक समिती गठीत करण्यात आली होती. सदर राज्य स्तरीय समितीने दि.२३/३/२००७, दि.२७/७/२००७, दि.१४/१/२००८, दि.१०/३/२००८ व दि.११/३/२००८ रोजी बैठका घेऊन एकूण **६७ दावे मंजूर** केले व रु.६५.४८ लक्ष इतकी मदत संबंधित आपद्ग्रस्तांना वितरीत करण्यात आली आहे.

२. ज्या बाधित व्यक्तींच्या निवासी मालमत्तेचे अथवा विमा न काढलेल्या व्यापारी / औद्योगिक मालमत्तेचे नुकसान झाले होते, अशा बाधित व्यक्तींना यापूर्वी मदत दिलेली असल्यास ती रक्कम वगळून मदतीच्या १० पट रक्कम मदत म्हणून मंजूर करण्याचे केंद्र शासनाचे निदेश होते. ही बाब विचारात घेऊन राज्य स्तरीय समितीने त्यांच्याकडे प्राप्त प्रकरणांची छाननी केली असता असे दिसून आले की, सदर दंगलीमुळे झालेल्या अशांत वातावरणात काही व्यक्तींनी / कुटुंबांनी भयभित होऊन स्थलांतर केले होते. त्यामुळे अशा स्थलांतरित व्यक्तींच्या निवासी / व्यापारी / औद्योगिक मालमत्तेचे

प्रत्यक्षात नुकसान होऊनही त्यावेळी संबंधित आपद्ग्रस्तांना मदतीची रक्कम अदा करण्यात आलेली नाही. सदर आपद्ग्रस्तांना त्यांच्या झालेल्या नुकसानीच्या अनुषंगाने मदत देण्यात आलेली नसल्याने, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे सदरील स्थलांतरित बाधित व्यक्ती हे तांत्रिक दृष्ट्या मदतीसाठी अपात्र ठरविण्यात आले. परंतु पोलीस पंचनामा / प्रथम खबरी अहवाल (FIR) / महसूल पंचनामे इत्यादी पुराव्यावरुन बाधितांचे नुकसान झाल्याचे समितीने मान्य केले आहे. अशा प्रकारची राज्यामध्ये एकूण ६६ प्रकरणे समितीने वेगळी काढली असून, त्यांना केंद्र शासनाच्या निकषानुसार केंद्र शासनाकडून कोणतीही मदत उपलब्ध होणार नव्हती. तद्नंतर दि.७/२/२०१३ च्या शासन निर्णयाव्दारे राज्य स्तरावर गठीत करण्यात आलेली समिती विसर्जित करण्यात आलेली आहे.

३. मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ यांनी रिट पिटीशन क्र.१०४९७/२०१२ मध्ये दि.२६/९/२०१४ रोजी श्री.राजपूत यांच्या खानावळीचे १९८४ च्या दंगलीत नुकसान झाल्याने, त्यांना रु.७१,०००/- इतकी रक्कम अदा करण्याचे आदेश दिले. मा.उच्च न्यायालयाच्या आदेशास अनुसरुन नुकसानीची रु.७१,०००/-इतकी रक्कम श्री.रामवृक्षसिंह राजपूत यांना संदर्भाधिन शासन निर्णय दि.७.१.२०१५ अन्वये अदा करण्यात आली.

४. सन १९८४ च्या दंगलीमध्ये शीख समाजाच्या झालेल्या नुकसानीबद्दल न्या.नानावटी आयोगाच्या शिफारशीनुसार नुकसान भरपाई मिळण्याबाबत श्री.परमजितसिंग गटोरे व अन्य ४ (श्री.बलरामसिंग प्यारासिंग संधू, श्री.प्यारासिंग कर्तारसिंग संधू, श्री.कलविंदरसिंग हरजितसिंग डडियाल, श्री.अवतारसिंग जर्नेलसिंग माथारु) यांनी मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे याचिका दाखल केल्या होत्या. श्री.गटोरे व अन्य याचिकाकर्त्यांनी त्यांच्या याचिकेमध्ये मालमत्तेच्या नुकसानीप्रकरणी न्या.नानावटी आयोगाच्या शिफारशीनुसार नुकसान झालेल्या मालमत्तेच्या १० पट रक्कम व पुनर्वास अनुदानाची मागणी केली आहे. श्री.परमजितसिंग गटोरे यांनी दाखल केलेल्या रिट पिटीशन क्र.५७०३/२०१० मध्ये मा.उच्च न्यायालयाने दि.१४/६/२०१२ रोजी जिल्हाधिकारी, अहमदनगर यांनी अर्जदाराच्या निवेदनाचा विचार करुन ४ महिन्यामध्ये उचित निर्णय घेण्याचे आदेश दिले होते. मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निकालाच्या अनुषंगाने विभागीय आयुक्त, नाशिक यांनी जिल्हाधिकारी, अहमदनगर यांचा प्रस्ताव राज्य शासनाकडे सादर केला होता. सदर प्रस्तावात केंद्र शासनाच्या धोरणास अनुसरुन नुकसानीच्या १० पट रक्कम देण्याची शिफारस करण्यात आली होती. त्यामुळे जिल्हाधिकारी यांचा प्रस्ताव केंद्र शासनाकडे सादर करण्यात आला.

केंद्र शासनाने त्यांच्या दि.१८ फेब्रुवारी, २०१५ च्या पत्रान्वये असे कळविले आहे की, प्रस्तुत पाचही प्रकरणांमध्ये राज्य शासनाने १) न्यायालयीन आदेश, २)जिल्हा अथवा जिल्हा शेतकरी आत्महत्त्या समितीची शिफारस, ३) राज्य स्तरीय समितीने सन २००८ मध्ये केलेली शिफारस, ४) केंद्रीय पुनर्वसन पॅकेज, २००६ इ. बाबींच्या अनुषंगाने आवश्यक ती तपासणी करुन **योग्य दाव्यांमध्ये** मदत अदा करावी.

५. श्री.रामवृक्षसिंह राजपूत यांच्याप्रमाणेच ज्या व्यक्तींच्या मालमत्तेचे प्रत्यक्षात नुकसान झालेले आहे, अशा अन्य ६५ व्यक्तींना (मा.उच्च न्यायालयात याचिका दाखल केलेल्या श्री.परमजित सिंग त्रिलोकसिंग गटोरे, श्री.हरजितसिंग महेंद्रसिंग दाडियाल व श्री.अवतारसिंग जनरलसिंग मथारु या ३ व्यक्तींचादेखिल यामध्ये समावेश आहे) त्यांच्या मालमत्तेचे प्रत्यक्षात जितके नुकसान झालेले आहे तेवढी मदत राज्य शासनामार्फत देण्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे -

**शासन निर्णय :-**

सन १९८४ मध्ये झालेल्या शीख दंगलीमध्ये मालमत्तेचे नुकसान झालेल्या ६६ प्रकरणी एकूण रु.२६,६२,५५५/- इतके मालमत्तेचे नुकसान झाले आहे. राज्य स्तरीय समितीने अशा ६६ प्रकरणे केंद्रीय मदतीस अपात्र ठरविली आहेत. सदर ६६ व्यक्तींपैकी श्री.रामवृक्षसिंह राजपूत यांना मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार रु.७१,०००/- इतकी मदत अदा करण्यात आली आहे. त्याच धर्तीवर अन्य ६५ व्यक्तींना समान तत्त्वावर न्याय देण्याच्या दृष्टीने तसेच सर्व बाबींचा सर्वंकष विचार करुन, राज्य शासनाने अन्य ६५ व्यक्तींना त्यांच्या नुकसानीची मूळ रक्कम अदा करण्याचा निर्णय घेतला आहे. मदतीस पात्र ठरलेल्या ६५ व्यक्तींची यादी सोबतच्या प्रपत्रात देण्यात आली आहे.

२. त्यासाठी एकूण रु.२५,९१,५५५/- (अक्षरी रुपये पंचेवीस लक्ष एक्याण्णव हजार पाचशे पंचावन्न फक्त) इतक्या खर्चास सन २०१५-१६ या वित्तीय वर्षामध्ये खालील लेखाशीर्षांतर्गत आकस्मिकता निधी अग्रीमाव्दारे तरतूद करुन खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

मागणी क्रमांक : सी-५,
२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ,
६० इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम ,
२००- इतर कार्यक्रम ,
२०० (०१) (०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य
(२२३५ ०३४७) (दत्तमत)
३१-सहाय्यक अनुदाने

३. सन १९८४ च्या शीख दंगलीत बाधित झालेल्या व्यक्तींच्या दाव्यांची तपासणी करण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीने श्री.बलरामसिंग प्यारासिंग संधू, श्री.प्यारासिंग कर्तारसिंग संधू यांना अपात्र ठरविल्यामुळे त्यांना नुकसानी भरपाई न देण्याचा निर्णय घेण्यात आल्याने यासंदर्भात जिल्हाधिकारी, अहमदनगर यांच्याकडून प्राप्त झालेला प्रस्ताव अमान्य करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१८१८५६३०००१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Ashok Rajaram Jagtap

Digitally signed by Ashok Rajaram Jagtap
DN: CN = Ashok Rajaram Jagtap, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.05.18 19:02:13 +05'30'

**(अ.रा.जगताप)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक / पुणे / औरंगाबाद
२) जिल्हाधिकारी, नाशिक / अहमदनगर/ जळगाव / सांगली / उस्मानाबाद
३) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक /अहमदनगर/ जळगाव/ सांगली/उस्मानाबाद
महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपूर

४) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपूर
५) वित्त विभाग (अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-४/अर्थसंकल्प-६/व्यय-९),मंत्रालय,मुंबई
६) कक्ष अधिकारी, ब-१/पीएसी/पीएसी-१ कार्यासने, म.व व.वि., मंत्रालय, मुंबई-३२
७) निवडनस्ती (म-३ कार्यासन) महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई ३२

**प्रत माहितीसाठी**

१) मुख्य सचिव यांचे विशेष कार्यकारी अधिकारी, मंत्रालय, मुंबई
२) सचिव (म.व पु.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
३) संचालक, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

*******

**महसूल व वन विभाग ,शासन निर्णय क्र.** आरएलएफ-०५-०६/प्र.क.२०८/भाग-म-३

**दिनांक२मे,२०१५ चे प्रपत्र**

**सन १९८४ मध्ये झालेल्या शीख दंगलीत मालमत्तेचे नुकसान झालेल्या, केंद्र शासनाच्या निकषात न बसणा-या व राज्यस्तरीय समितीने शिफारस केलेल्या आपद्ग्रस्तांची यादी**

| अ.क्र. | आपद्ग्रस्ताचे नाव | नुकसान (रु.) |
|---|---|---|
| १ | जसवंतसिंह जिनसिंह चांडोक, जि.सांगली | ३,०००/- |
| २ | सोमनाथ जयराम तलवाड, जि. उस्मानाबाद | १५,०००/- |
| ३ | दलजितसिंग जीवनसिंह भल्ला, जि.नाशिक | ३,०००/- |
| ४ | जनकराज नानकचंद छाबडा, जि.अहमदनगर | ६३,०००/- |
| ५ | अशोक गोविंदराव नारंग, जि.अहमदनगर | ७५,०००/- |
| ६ | अनुपसिंग जीवनमल वधवा, जि.अहमदनगर | ५०,०००/- |
| ७ | गुरुबक्षसिंग जीवनमल वधवा, जि.अहमदनगर | ४५,०००/- |
| ८ | सतावणदास हस्सूमल चूग, जि.अहमदनगर | १४,८९०/- |
| ९ | माणिकचंद गोविंदराम सहानी, जि.अहमदनगर | ३०,०००/- |
| १० | सुष्टीपाल जगन्नाथ धुस्सा, जि.अहमदनगर | २५,०००/- |
| ११ | पवनकुमार हकमचंद माटा , जि.अहमदनगर | १३,३२०/- |
| १२ | हरिषकुमार हकमचंद माटा, जि.अहमदनगर | १७,०००/- |
| १३ | सुरजितसिंग किशोरीलाल बांगा, जि.अहमदनगर | १७,०००/- |
| १४ | सोहनलाल खुशीराम गुप्ता जि.अहमदनगर | ३६,०००/- |
| १५ | अमोलमल फिरोजमल धिंग्रा, जि.अहमदनगर | ४०,०००/- |
| १६ | सत्यदेव शेकरदास कोहली, जि.अहमदनगर | १,१५,०००/- |
| १७ | इंद्रलाला पिशोरीलाल बांगा, जि.अहमदनगर | २०,०००/- |
| १८ | हिम्मीतकुमार जिवनसिंग गुलाटी, जि.अहमदनगर | १०,०००/- |
| १९ | प्रवीणकुमार मोहनलाल कंत्रोड, जि.अहमदनगर | ४०,०००/- |
| २० | मुरलीधर शामलदास तलरेजा, जि.अहमदनगर | ७६,०००/- |
| २१ | राजकुमार पिशोरीलाल बांगा, जि.अहमदनगर | १५,०४५/- |
| २२ | ब्रिजलाल लच्छीराम भागवानी, जि.अहमदनगर | ५०,०००/- |
| २३ | श्रीचंद बालमुकुंद वधवा, जि.अहमदनगर | ३५,०००/- |
| २४ | मनोहरलाल मदनलाल एस. बत्रा, जि.अहमदनगर | ८,५००/- |
| २५ | मोहनसिंग सरदारसिंग कथुरीया, जि.अहमदनगर | २५,०००/- |
| २६ | बलवंतसिंग कथुरीया , जि.अहमदनगर | २५,०००/- |
| २७ | रविंद्रसिंग महेंद्रसिंग गुरुवारा, जि.अहमदनगर | ८१,०००/- |
| २८ | नविंद्रसिंग हाकमचंद माटा, जि.अहमदनगर | १३,०००/- |
| २९ | शरणसिंग एल. सेठी, जि.अहमदनगर | ५,१०,०००/- |
| ३० | किसनलाल साईदत्तसिंग बतरा, जि.अहमदनगर | ३०,०००/- |
| ३१ | जगमोहनसिंग इकबालसिंग इस्सार, जि.अहमदनगर | ११,०००/- |
| ३२ | सुनिल चंद्रप्रकाश गुप्ता, जि.अहमदनगर | ३२,९००/- |
| ३३ | भुपेंद्रसिंग बलवंतसिंग बन्सल, जि.अहमदनगर | १८,०००/- |

| | | |
|---|---|---|
| ३४ | पांडुरंग दगडू गुजर, जि.अहमदनगर | ४,०००/- |
| ३५ | मनजितसिंग प्रतापसिंग चानी, जि.अहमदनगर | ७,०००/- |
| ३६ | उध्दव परमानंद चुग, जि.अहमदनगर | १२,०००/- |
| ३७ | नारायणदास परमानंद चुग, जि.अहमदनगर | ७,५००/- |
| ३८ | आसिफ अमिरअली मेघानी, जि.अहमदनगर | १,०१,०००/- |
| ३९ | नवलमल सय्याजीराव छानवाणी, जि.अहमदनगर | १४,७००/- |
| ४० | ठाकूर नवलमल छानवाणी, जि.अहमदनगर | १५,५००/- |
| ४१ | बालकृष्ण श्रीधन पांडे, जि.अहमदनगर | १६,४५०/- |
| ४२ | श्रीमती मेमकौर त्रिलोकसिंग सेठी, जि.अहमदनगर | ३०००/- |
| ४३ | बलजिंदरसिंग स्वराज्यसिंग सेठी, जि.अहमदनगर | १,३१,०००/- |
| ४४ | *परमजितसिंग त्रिलोकसिंग गटोरे, जि.अहमदनगर* | *३०,०००/-* |
| *४५* | *हरजितसिंग महेद्रंसिंग दाडियाल, जि.अहमदनगर* | *२०,०००/-* |
| *४६* | *अवतारसिंग जर्नेलसिंग मथारु, जि.अहमदनगर* | *१,००,०००/-* |
| *४७* | संतसिंग सोमसिंग ठकराल, जि.अहमदनगर | २४,५००/- |
| ४८ | विनोदकुमार संतसिंग ठकराल, जि.अहमदनगर | २०,०००/- |
| ४९ | दिलीपसिंग संतसिंग ठकराल, जि.अहमदनगर | २०,०००/- |
| ५० | गुरुसिंग सभा चॅरीटेबल ट्रस्ट, जि.अहमदनगर | १,५००/- |
| ५१ | कृष्णा नरेंद्रसिंग सारडा व जितेद्रसिंग सारडा, जि.अहमदनगर | २०,०००/- |
| ५२ | जितेद्रसिंग सारडा व कृष्णा सारडा, जि.अहमदनगर | २०,०००/- |
| ५३ | गोंविदकौर हरबन्ससिंग सहानी, जि.अहमदनगर | १५,६००/- |
| ५४ | श्रीमती सुखराजकौर गुरुमुखसिंग बेदी, जि.जळगाव | ४२,५९०/- |
| ५५ | बेअंतसिंग सरदार इंदरसिंग सांडल, जि.जळगाव | ४८,१७०/- |
| ५६ | हरबक्षसिंग करतारसिंग सिध्दु, जि.जळगाव | ५,०००/- |
| ५७ | सौ प्रभा मदनलाल सुराणा, जि.जळगाव | १,३७,६५०/- |
| ५८ | कुलदिपसिंग मानसिंग गुजराल, जि.जळगाव | १०,०००/- |
| ५९ | जसपालसिंग संतोकसिंग माथारु, जि.जळगाव | २५,०००/- |
| ६० | कमलजितसिंग हिम्मतसिंग छाबडा, जि.जळगाव | ५०,०००/- |
| ६१ | मनजितसिंग कर्तारसिंग संधू व वसंतकौर कर्तारसिंग संधू, जि.जळगाव | ५०,०००/- |
| ६२ | तारासिंग शेरसिंग धिंड, जि.जळगाव | १०,७००/- |
| ६३ | श्रीमती राजेंद्रकौर जोजरसिंग नैब, जि.जळगाव | २५,०००/- |
| ६४ | वसंत ओंकार वाणी, जि.जळगाव | ३५,६९०/- |
| ६५ | महेंद्रपालसिंग जसवंतसिंग आनंद, जि.जळगाव | १५,३५०/- |
| | एकूण | २५,९१,५५५/- |